**"ई-फेरफार" व "ई-चावडी" या प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी राज्यातील तहसिलदार, उप अधीक्षक भूमि अभिलेख व नगर भूमापन अधिकारी अशा राज्यातील एकूण ७३९ कार्यालयांमध्ये मे. भारत संचार निगम लि. व मे. महानगर टेलिफोन निगम लि. या संस्थांकडून स्थापित करण्यात आलेली कनेक्टिव्हीटी सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षात सुरू ठेवण्याकरीता संपुर्ण वर्षाचे आगाऊ शुल्क अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राभूअ २०१६/प्र.क्र. ७१/ल- १**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :-१४ जून, २०१७

**वाचा-**

१) दि. १६/१०/२०१२ च्या उच्चस्तरीय समितीच्या ७३ व्या बैठकीचे इतिवृत्त
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक राभूअ २०१३/ प्र.क्र २/ ल-१, दि. ०४/०१/२०१३
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक राभूअ २०१२/ प्र.क्र ४५०/ ल-१, दि. २१/०१/२०१३
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक संकीर्ण २०१६/ प्र.क्र ७१/ ल-१, दि. ३१/०३/२०१६
५) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा दि. ०६/०३/२०१७ चा प्रस्ताव

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (ई धरती) या कार्यक्रमांतर्गत "ई-फेरफार" (फेरफार प्रक्रीयेचे संगणकीकरण) व "ई-चावडी" (गाव दप्तराचे संगणकीकरण) प्रकल्प राज्यात राबविण्यांत येत आहेत. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दिनांक १६/१०/२०१२ रोजी झालेल्या ७३ व्या बैठकीतील मान्यतेस अनुसरून सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता क्षेत्रीय पातळीवरील विविध कार्यालयांना आवश्यक असणारी कनेक्टिव्हीटी पुरविणेकरीता मे. भारत संचार निगम लि. व मे. महानगर टेलिकॉम निगम लि. या संस्थांची निवड करण्यात आलेली आहे. त्यानुसार राज्यातील तहसीलदार, उप अधीक्षक भूमि अभिलेख व नगर भूमापन अधिकारी यांच्या कार्यालयांना मे. भारत संचार निगम लिमिटेड व मे. महानगर टेलिकॉम निगम लि. यांच्याकडून अनुक्रमे Virtual Private Network over Broadband (VPNoBB) व MPLS VPN कनेक्टिव्हीटी एक वर्षाकरीता स्थापित करण्यासाठी दिनांक २१/०१/२०१३ रोजीच्या संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयानुसार मंजुरी देणेत आली होती. तसेच ही सेवा पुढे सुरू ठेवण्यास वेळोवेळी शासन मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र. ४ अन्वये मान्यता देण्यात आलेली मुदत दि. ३१/०३/२०१७ रोजी संपलेली आहे. "ई-फेरफार" व "ई-चावडी" प्रकल्पांकरीता इंटरनेट

कनेक्टिव्हिटी चालू ठेवणे अनिवार्य आहे. तथापि VPNoBB च्या वापरामुळे क्षेत्रिय पातळीवर काही तांत्रिक अडचणी येत असल्याने VPNoBB ऐवजी ब्रॉडबॅण्ड सेवा वापरण्याची बाब विचाराधीन असून तत्संबंधीची पूर्वतयारी पूर्ण होण्यास आणखी काही कालावधी लागणे अपेक्षित आहे. या पार्श्वभूमीवर एप्रिल, २०१७ ते जून, २०१७ या ३ महिन्यांच्या कालावधीसाठी VPNoBB / MPLS (VPN) कनेक्टिव्हीटी पूर्ववत सुरु ठेवून जुलै, २०१७ ते मार्च, २०१८ या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी ब्रॉडबॅण्ड कनेक्टिव्हीटी घेण्याची व सदर कनेक्टिव्हीटीसाठी मे. भारत संचार निगम लिमिटेड व मे. महानगर टेलिकॉम निगम लि. या संस्थांना आगाऊ शुल्क अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या संदर्भात शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे:-

**<u>शासन निर्णय:-</u>**

१) "ई-फेरफार" तसेच "ई-मोजणी" या प्रकल्पांतर्गत राज्यातील सर्व तहसिलदार, उपअधीक्षक भूमि अभिलेख व नगर भूमापन अधिकारी यांच्या कार्यालयांमध्ये सन २०१७-२०१८ या वर्षात भारत संचार निगम लि. व मे. महानगर टेलिकॉम निगम लि. या संस्थांकडून १ एप्रिल, २०१७ ते ३० जून, २०१७ या ३ महिन्यांच्या कालावधीसाठी यथास्थिती VPNoBB / MPLS (VPN) कनेक्टिव्हीटी सुरु ठेवावी तसेच "ई-फेरफार" आज्ञावलीचे नवीन व्हर्जन राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे यांनी लागू केल्यावर १ जुलै, २०१७ ते ३१ मार्च, २०१८ या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी ब्रॉडबॅण्ड कनेक्टिव्हीटी घेण्यात यावी.

२) सदर कनेक्टिव्हीटीकरीता मे. भारत संचार निगम लिमिटेड व मे. महानगर टेलिकॉम निगम लि. या संस्थांना सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षाचे आगाऊ शुल्क अदा करण्याकरीता अनुक्रमे रक्कम रूपये ३,१६,१०,७६७ /- (अक्षरी रु. तीन कोटी सोळा लाख दहा हजार सातशे सदुसष्ट फक्त) व रक्कम रूपये ८,८०,९००/- (अक्षरी आठ लाख ऐंशी हजार नऊशे फक्त) अशी एकुण रक्कम रूपये ३,२४,९१,६६७/- (अक्षरी रु. तीन कोटी चोवीस लाख एक्याण्णव हजार सहाशे सदुसष्ट फक्त) खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर तरतूद जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे या शासन निर्णयाव्दारे सुपुर्द करण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च " मागणी क्र. सी.१, २०२९ जमीन महसूल १०३, जिल्हा भूमि अभिलेख (०२) संचालक भूमि अभिलेख २०२९ ०४२२ (१७) संगणक खर्च (योजनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षात मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या प्रयोजनासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राहतील. सदर निधीच्या विनियोगासाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत तसेच खर्चाचा ताळमेळ महालेखापालांकडे वेळोवेळी देण्याची दक्षता घ्यावी. प्रस्तुत निधीबाबत आर्थिक व भौतिक अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह शासनास पाठवावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१४१६३८२४८११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2017.06.14 16:35:40 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
उप सचिव,
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (मा.तं), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१४) कोषागार अधिकारी, पुणे
१५) राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, मुंबई
१६) माहिती जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१७) माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) नियोजन विभाग, का.क्र.१४७५, मंत्रालय, मुंबई
१९) वित्त विभाग,कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई.